आदिवासी क्षेत्र उपयोजना/आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना जून,२०१४ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यांत आलेल्या विविध उपशिर्षांखालील योजनांतर्गत तरतुदीचे वाटप

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र.१७१/का.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: १२ ऑगस्ट,२०१४

**वाचा -**

१) वित्त.विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक २०१४/प्र.क्र.११२/अर्थ-३, दि.४.७.२०१४.

२) शा.शि.व.क्रि.विभागाची नस्ती क्र.माशाअ २०१३/प्र.क्र.०६/१३/एसएम-४

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र ( पुरवणी) विनियोजन अधिनियम,२०१४ (सन २०१४ चा महाराष्ट्र अधिनियम क्र-२१ ) म्हणुन महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४ दिनांक २५ जुलै,२०१४ रोजी पुरवणी मागण्यांच्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या वितरणासाठी पारित झाला आहे. शासन आता या निर्णयाद्वारे सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-२ मध्ये दर्शविलेल्या योजनांच्या तरतूदी स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रक अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यास व खर्च करण्यास मंजूरी देत आहे.

२. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षत्रातील व क्षत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षेने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षत्रातील व उपयोजने क्षत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष/नियंत्रण ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

४. सर्व नियंत्रण अधिका-यांनी योजनावार मासिक खर्चाची विवरणे आदिवासी उपक्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी व आदिवासी उपयोजना क्षत्राबाहेरील क्षेत्रासाठी स्वतंत्रपणे विहीत प्रपत्रात ज्या महिन्यात खर्च झाला असेल त्याच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागास, नियोजन विभाग, वित्त विभाग व इतर संबंधित प्रशासकीय विभाग व आयुक्त, आदिवासी विकास, यांचे कार्यालय, नाशिक यांना पाठवाव्यात.

५. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची नियंत्रक अधिका-यांनी नोंद घ्यावी.

६. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी उपक्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५०/२०१४, दि.३०.७.२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१३११०९५१३५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Naik Suresh D

Digitally signed by Naik Suresh D
DN: CN = Naik Suresh D, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = MTD
Date: 2014.08.16 10:02:54 +05'30'

**( सु. द. नाईक )**
**कार्यासन अधिकारी**

१. प्रत,

२. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक

३. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे /नाशिक/ अमरावती/ नागपूर

४. उपसचिव (श्री.गंब्रे) यांचे स्वीय सहायक, आ.वि.वि,

५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर

७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

८. शालेय शिक्षण विभाग, (कार्यासन-एसएम-४), मंत्रालय, मुंबई-३२

९. कक्ष अधिकारी ( कार्यासन क्र. २ / १२ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.निवड नस्ती (का.६)

आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २०१४-१५ चे पूरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत तरतूदीचे वाटप
पूरक मागणी बाब क्र.२०७

| शिर्ष : सर्वसाधारण शिक्षण<br>योजनेचे नांव : सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (रु.हजारात) | | मागणी क्र.टी-५<br>मुख्य लेखाशिर्ष : २२०२, सर्वसाधारण शिक्षण ०२, माध्यमिक शिक्षण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान<br>**(२२०२ १९०१) ३६, सहायक अनुदाने (वेतन)** | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे नांव | २०१४-१५ साठी केलेली तरतूद | २०१४-१५ ची पूरक मागणीद्वारेअर्थसंकल्पीय तरतूद सुपुर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **एकूण** | १ | सचिव<br>शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | जून,२०१४ च्या पूरक मागणी पुस्तकामध्ये छापलेल्या कामांसाठी उपलब्ध करुन दिलेली तरतूद |

----------------